**भूमि अभिलेख विभागासाठी संगणक साहित्य खरेदी करण्यास मंजुरी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण -२०१४/ प्र.क्र. १३२/ ल-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
तारीख : ३१ मार्च २०१५

वाचा -१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे पत्र क्र.लेखा-१/ प्र. क्र. ६२८/१५, दिनांक २०/०२/२०१५.

**प्रस्तावना:-**

भूमि अभिलेख विभागामध्ये ई-ऑफिस संकल्पना कार्यान्वित करण्यासाठी जमाबंदी आयुक्त तथा संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त संगणक साहित्य खरेदीबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.सदर खरेदी प्रस्तावाच्या अनुषंगाने महसूल विभागाच्या "प्रकल्प अंमलबजावणी समितीची" बैठक दि.२५/०३/२०१५ रोजी घेण्यात आली असता या बैठकीमध्ये रुपये ३३३.६१ लाख या रकमेची संगणक सामुग्री खरेदी करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर मंजुरीच्या अनुषंगाने निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

भूमि अभिलेख विभागाकरिता संगणक,खरेदीसाठी रक्कम रुपये १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) वितरीत करण्यास शासन या शासन निर्णयाव्दारे मंजुरी देत आहे. सदर निधीतून संगणक साहित्याची खरेदी शासनाने विहीत केलेल्या खरेदीच्या कार्यपध्दतीनुसार करण्यात यावी.

२. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक सी १, २०२९ १०२ सर्व्हेक्षण व जमाबंदीची कामे (००) (०१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे याची आस्थापना (२०२९०३४२" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षात मंजूर योजनेतर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११७ दि.३०/०३/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११४१२११३४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याआदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthal Veer

Digitally signed by Madhav Vitthal Veer
DN: CN = Madhav Vitthal Veer, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.01 15:00:28 +05'30'

**(डॉ. माधव वीर)**
**उप सचिव,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
४. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
५. वित्त विभाग, कार्यासन व्यय १०/ अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई
६. कार्यासन ब१/ब२ महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती कार्यासन ल-१, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई